**पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क संरक्षण या पदास मुदतवाढ देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-३११८/प्र.क्र.११/ पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ ऑक्टोंबर, २०१९.

वाचा:-

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.आयपीएस-१२०५/प्र.क्र.६०१/पोल-१,दि.३.१.२००६
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.आयपीएस-१२०५/प्र.क्र.३३२/पोल-१,दि.१०.२.२०१२
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.आयपीएस-१२१२/प्र.क्र.१६८/पोल-१,दि.९.४.२०१२
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र.भापोसे-१७१२/प्र.क्र.२९९/पोल-१,दि..०६.२०१२
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र.आयपीएस-१३१३/प्र.क्र.४५३/पोल-१,दि.२१.१०.२०१३
६) शासन निर्णय, गृह विभाग क्र.आयपीएस-१३१४/प्र.क्र.११३/पोल-१,दि.१९.०३.२०१४
७) शासन निर्णय, गृह विभाग क्र.आयपीएस-१३१५/प्र.क्र.३२/पोल-१,दि.३०.०३.२०१५
८) शासन निर्णय, गृह विभाग क्र.आयपीएस-०३१५/प्र.क्र.७८/पोल-१,दि.२०.१०.२०१५
९) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/प्र.क्र.११/पोल-३, दि.१८.०३.२०१९
१०) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/६१४३/ अपोमसं (नाहसं)/१३/२००६, दि.०३.०७.२०१९.
११) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९.

प्रस्तावना:-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदाच्या कामकाजाचा व्याप वाढल्यामुळे संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०३ जानेवारी,२००६ च्या शासन निर्णयान्वये या पदाची अपर पोलीस महासंचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई दर्जाच्या पदामध्ये प्रथमत: श्रेणीवाढ करण्यास मान्यता देण्यात आली होती. गृह विभाग, शासन निर्णय, दि.०५.१०.२०१० अन्वये सदर पदास पुन्हा विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई असे श्रेणीअवनत करण्यात आले. सदर अस्थायी पदास दिनांक २८.०२.२०१० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली.

तद्नंतर संदर्भ क्र.४ येथील दि.- जून,२०१२ च्या शासन निर्णयन्वये या पदाची अपर पोलीस महासंचालक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई अशी श्रेणीवाढ करण्यात आली आहे. गृह विभाग, शासन निर्णय, दि.२०.१०.२०१५ अन्वये सदर पदास पुन्हा विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई असे श्रेणीअवनत करण्यात आले आहे. या पदास वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली असून संदर्भाधिन क्र.०९ येथील दिनांक १६.०३.२०१८ च्या शासन निर्णयाद्वारे दि.०१.०३.२०१९ पासून दिनांक ३०.०९.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. सबब या पदास दि.०१.१०.२०१९ पासुन पुढे मुदतवाढ द्यावयाची असल्याने पोलीस महासंचालकांनी संदर्भ क्र.१० अन्वये प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क संरक्षण हे पद ज्या परिस्थितीत श्रेणीअवनत केले होते ती परिस्थिती अद्यापही कायम असून सदर अस्थायी पद सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नव्हते. सदर वस्तूस्थिती विचारात घेता, शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क संरक्षण या अस्थायी पदास **दिनांक ०१ ऑक्टोबर,२०१९ ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१,दिनांक १९ ऑगस्ट २००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

२) आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा.

३) सदर कालावधीमध्ये कोणत्याही परिस्थितीत पदांचा आढावा उच्चस्तरीय समितीसमोर ठेवून मान्यता घेण्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.११ येथील दिनांक ११.०९.२०१९ च्या शासन निर्णयानुसार सूचित केलेले आहे. सदर कालावधीमध्ये सर्व प्रशासकीय विभागांनी कोणत्याही परिस्थितीत त्यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांच्या

आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेऊन, सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. यानंतर सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढवून देण्यात येणार नसल्याबाबत वित्त विभागाने सूचित केले आहे. तसेच सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या(खुद्द) आस्थापनेवरील पदांना तसेच,त्यांच्या नियंत्रणाखालील क्षेत्रिय कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा आढावा घेवून,सुधारित आकृतीबंधाचा प्रस्ताव तातडीने वित्त विभागास सादर करण्याचे नियोजन करून त्वरीत कार्यवाही करण्याच्या सूचना संबधित अधिका-यांना देण्याबाबत सूचित केले आहे.

४) आकृतीबंध निश्चित करावयाची कार्यवाही उशिरात उशिरा दिनांक २९.०२.२०२० पर्यंत पुर्ण करावयाची आहे. ही बाब विचारात घेता दिनांक २९.०२.२०२० अखेर पर्यंत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, उपरोक्त अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहिल.

२. सदरचा खर्च "२०५५-पोलीस-००१-संचालन व प्रशासन-पोलीस निरीक्षालये" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१९-२० या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ११.०९.२०१९ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००७१५४१४७००२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2019.10.07 15:42:45 +05'30'

**( दिनेश सस्ते )**

कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. विशेष पोलीस महानिरीक्षक,नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
७. गृह विभाग, कार्यासन (बीयुडी-१/पोल-१/विशा-६).
८. वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
९. निवड नस्ती (पोल-३).